**शासकीय तसेच खाजगी बांधकामे करण्यासाठी आवश्यक असलेल्या बांधकाम साहित्यासाठी (दगड, खडी, मुरुम इत्यादी) शासकीय खदाने उपलब्ध करुन देणेबाबत. अभ्यास गटाची स्थापना करणे.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
शासन निर्णय क्र.बीडीजी २०१५/प्र.क्र.०९/इमा.२
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक - १३ फेब्रुवारी, २०१५

**प्रस्तावना** -

सार्वजनिक बांधकाम विभागामार्फत शासनाच्या विविध विभागांसाठी इमारती व रस्त्यांची बांधकामे करण्याची कामे करण्यात येतात. या कामांसाठी मोठया प्रमाणात खडी, मुरुम, वाळु व इतर साहित्य लागते. या साहित्याचे उत्खनन करण्यासाठी शासकीय जमीनीवर खदानी यापूर्वीच्या काळात उपलब्ध होत्या. तथापी सन १९८० नंतर या खदानी मृतवत झाल्याने त्यांचा वापर करणे बंद झाले आहे. यामुळे आता सद्य:स्थितीत प्रकल्पांची अंदाजपत्रके तयार करतांना खाजगी मालकीच्या खदानींमधून बांधकाम साहित्य उपलब्ध करुन घेणे आवश्यक ठरते. क्षेत्रिय स्तरावर अंदाजपत्रके तयार करतांना पूर्वीच्या पध्दतीप्रमाणे मृत शासकीय खदानींचा वापर अंदाजपत्रके तयार करतांना करण्यात येतो. प्रत्यक्षात या खदानीमधून साहित्य उपलब्ध होत नसल्याने अंदाजपत्रके वस्तुस्थितीशी सुसंगत राहात नसल्याने कामांच्या निविदा निश्चित करतांना निविदा जास्त दराच्या येवून त्या स्विकृत करण्यासाठी बराच कालावधी लागून प्रकल्पांची कामे कालमर्यादेत पूर्ण करणे शक्य होत नाही. तसेच कंत्राटदारांमार्फत या संदर्भात दावेही शासनाकडे प्राप्त होतात.

२. प्रत्येक जिल्हयामध्ये शासकीय जमीनीमध्ये कोणत्या ठिकाणी खदानी उपलब्ध उपलब्ध करुन देता येतील याचा अभ्यास करुन त्याची निश्चिती केल्यास अंदाजपत्रके तयार करतांना वस्तुस्थितीशी सुसंगत अंदाजपत्रके तयार करणे शक्य होईल. तसेच कामांच्या किंमती कमी करता येणे शक्य आहे. यामुळे निविदा प्रक्रीयाही सुरळीत पार पडून कामे विहित कालमर्यादेत पूर्ण करणे शक्य होईल. यासाठी व सार्वजनिक बांधकाम विभागाशी संबंधित अन्य बाबींचा अभ्यास करण्यासाठी प्रायोगिक तत्वावर पायलट प्रोजेक्ट म्हणून लातूर जिल्हयाची निवड करुन अभ्यासगट स्थापन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. या संदर्भात शासन आता खालीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय -**

वरील प्रस्तावनेच्या पार्श्वभुमीवर जिल्हाधिकारी लातूर यांच्या अध्यक्षतेखाली अभ्यास गटाची नियुक्ती करण्याचा निर्णय घेण्यात येत आहे. या अभ्यास गटाची सर्वसाधारण रचना खालीलप्रमाणे राहील.

**समितीची रचना –**

| | | | |
|---|---|---|---|
| १ | श्री.पांडुरंग कोल्हे | जिल्हाधिकारी , लातूर | अध्यक्ष |
| २ | श्री.अभिमन्यू पवार | मा.मुख्यमंत्री यांचे स्विय सहाय्यक | सदस्य |
| ३ | श्रीमती अरुंधती शर्मा | सहाय्यक मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.वि., औरंगाबाद | सदस्य |
| ४ | श्री.बी.आर.कारंडे | अधिक्षक अभियंता, महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपन | प्रतिनिधी |
| ५ | श्रीमती पल्लवी सोनावणे | कार्यकारी अभियंता, दक्षता व गुणनियंत्रण मंडळ औरंगाबाद | सदस्य |
| ६ | श्री.रणजित हांडे | कार्यकारी अभियंता, सा.बां.विभाग, उस्मानाबाद | सदस्य |
| ७ | श्री.विवेक बडे | कार्यकारी अभियंता सा.बां.विभाग, लातूर | सदस्य |
| ८ | श्री भरत रामकिंशन शिंग | कार्यकारी अभियंता, औरंगाबाद पाटबंधारे विभाग, औरं | सदस्य |
| ९ | कार्यकारी अभियंता, महराष्ट्र जीवन प्राधिकरण | कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, नागरी ग्रामीण विभाग, लातूर. | प्रतिनिधी |
| १० | श्री.शिवाजी शिंदे | उपजिल्हाधिकारी, विभागीय आयुक्त कार्यालय, औरंगा | सदस्य |
| ११ | श्री.सुनिल यादव | जिल्हा पुरवठा अधिकारी, लातूर | सदस्य सचिव |
| १२ | श्री.संतोष कुलकर्णी | उप अभियंता, एन.एच.ए.आय.सोलापूर | सदस्य |
| १३ | श्री.विजयकुमार शेटे | रा. लातूर | सदस्य |

सार्वजनिक बांधकाम विभागाच्या प्रत्यक्ष बांधकामासंदर्भात उपरोक्त प्रस्तावनेतील परिच्छेद २ अंतर्गत करावयाच्या सुधारणांबाबत अभ्यास करून सदर अभ्यास गटाने एक महिन्याच्या कालावधीत त्यांचा अहवाल शासनास त्यांच्या शिफारशींसह सादर करावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०२१३१५३०२९०३१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Bhatkhande C Vishwanath

Digitally signed by Bhatkhande C Vishwanath
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Bhatkhande C Vishwanath
Date: 2015.02.13 15:39:31 +05'30'

**(चं.वि.भातखंडे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) सचिव (रस्ते/सचिव (बांधकामे), सार्वजनिक बांधकाम विभाग यांचे स्वीय सहायक

२) अध्यक्ष, अभ्यास गट आणि सर्व सदस्य व प्रतिनिधी, अभ्यास गट.
३) श्री.अभिमन्यू पवार, मा.मुख्यमंत्री यांचे स्विय सहाय्यक
४) सर्व मुख्य अभियंते, सा.बां.विभाग
५) मुख्य अभियंता, बृहन्मुंबई क्षेत्रविकास प्राधिकरण, मुंबई.
६) अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, उस्मानाबाद
७) अधिक्षक अभियंता, दक्षता व गुणनियंत्रण मंडळ, औरंगाबाद
८) सर्व कार्यकारी अभियंते, सा.बां.विभाग
९) सर्व कार्यासन अधिकारी, सा.बां.विभाग, मंत्रालय.
१०) कार्यासन अधिकारी इमा.२ (निवडनस्ती)